**राष्ट्रीय चक्रीवादळ धोके निवारण प्रकल्प अंतर्गत बहुउद्देशीय निवारण केंद्र स्थानावर स्थानिकांना प्रक्षिण देणे तसेच शासकीय अधिका-यांना आपत्ती व्यवस्थापन विषयक क्षमता बांधणी संदर्भात प्रशिक्षण देणे बाबत.....**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग (मदत व पुनर्वसन)**
**शासन निर्णय क्र. आव्यप्र-२०१८/प्र.क्र.२५८/आव्यप्र-१**
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दि. ७ जानेवारी, २०१९

**प्रस्तावना:-**

महाराष्ट्र राज्य हे आपत्ती व्यवस्थापन प्रवण राज्य असल्याने राज्यामध्ये विविध भागात विविध आपत्तींचा सामना करावा लागतो. केंद्र शासनाच्या आपत्ती व्यवस्थापन अधिनियम २००५ च्या धर्तीवर राज्य आपत्ती व्यवस्थापन प्राधीकरणाची निर्मिती करण्यात आली.

दिनांक १६ जानेवारी, २०१८ च्या केंद्रीय गृह मंत्रालयाच्या आदेशान्वये राष्ट्रीय चक्रीवादळ धोके निवारण प्रकल्पामार्फत राष्ट्रीय आपत्ती व्यवस्थापन प्राधीकरण यांच्यातर्फे शासकीय अधिका-यांना आपत्ती व्यवस्थापनाची प्रभावी रित्या अंमलबजावणी करण्याबाबत, दक्षता अभिवृध्दी (Capacity Building) साठी प्रशिक्षण कार्यक्रम आयोजित करण्यासाठी निधी उपलब्ध करुन दिला आहे. या मध्ये राज्यात दोन बाबींवर प्रशिक्षण देण्यात येणार आहे.

अ) समुद्र किनाऱ्यावरील जिल्ह्यात १३ ठिकाणी बहुउद्देशीय निवारण केंद्र स्थापन करण्यात येणार आहे. त्या केंद्रावरील स्थानिकांना प्रक्षिण देण्यात येणार आहे. त्यासाठी राज्य शासनास रु.५२ लक्ष तरतूद मंजूर केलेली आहे.

ब) महाराष्ट्रातील ३६ जिल्ह्यातील शासकीय अधिकाऱ्यांना आपत्ती व्यवस्थापन संदर्भात दक्षता अभिवृध्दी (Capacity Building) साठी प्रशिक्षण देण्यात येणार राष्ट्रीय आपत्ती व्यवस्थापनाने निर्देशित केल्याप्रमाणे ५ विभागातील अधिका-यांना बाबतचे प्रशिक्षण देण्यात येणार आहे. आरोग्य विभाग, ग्रामीण स्थानिक संस्था, नागरी स्थानिक संस्था, पोलिस प्रशासन.

**शासन निर्णय:-**

१) राष्ट्रीय चक्रीवादळ धोके निवारण प्रकल्प राज्यात राबविण्यात येत असून राज्यातील सर्व जिल्हयातील शासकीय अधिका-यांना आपत्ती व्यवस्थापनाबाबत प्रभावी रित्या अंमलबजावणी करण्याबाबत, दक्षता अभिवृध्दी (Capacity Building) साठी प्रशिक्षण कार्यक्रम आयोजित करण्यात येणार आहे तसेच राज्यातील किनारी भागातील जिल्हयामध्ये बहुउद्देशीय चक्रीवादळ निवारा केंद्र उभारण्यात येणार असून त्या ठिकाणच्या स्थानिकांना प्रशिक्षण देण्यात येणार आहे. सदर कार्यक्रम सन २०२० पर्यंत राबविण्यात येणार आहे. या उद्दीष्टासाठी केंद्रशासनाने रू. ६.९० कोटी एवढा निधी मंजूर केला आहे. त्यापैकी रू. १.२५ कोटी निधी प्राप्त झाला आहे. बहुउद्देशीय चक्रीवादळ निवारा केंद्र अद्याप उभारण्यात आलेले नसल्याने, प्राप्त निधी जिल्हयातील अधिका-यांच्या प्रशिक्षणावर खर्च करण्यात येणार आहे. राज्यातील २२ जिल्हयातील अधिका-यांना दयावयाचे प्रशिक्षण हे

यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी (यशदा) मार्फत देण्यात येणार आहे. उर्वरित १४ जिल्हयांना प्रशिक्षण देण्यासाठी प्रशिक्षण प्रबोधिनी निश्चित करण्यासाठी प्रस्ताव सादर करण्यात आला आहे. सदर प्रशिक्षणासाठी प्राप्त निधीपैकी २२ जिल्हयासाठी निधी यशदा या संस्थेस प्रशिक्षण पुर्ण झाल्यावर देण्याबाबत प्रशासकीय आदेश देण्यात येत आहे. उर्वरित १४ जिल्हयासाठी प्रबोधिनी निश्चित झाल्यानंतर निधी वितरित करण्यात येईल.

२) या कामी होणारा खर्च मागणी क्रमांक सी-६, २२४५ नैसर्गिक आपत्ती निवारणासाठी सहाय्य ८०- सर्वसाधारण, १०२-आपत्ती प्रवण क्षेत्रामध्ये नैसर्गिक आपत्कालीन परिस्थितीबाबतच्या तातडीच्या योजनांचे व्यवस्थापन करणे (०७) (०१) धोके प्रवणता व्यवस्थापनासाठी तांत्रिक सहाय्य (२२४५-२६१२) ३१ सहाय्य अनुदान या लेखाशिर्षाखाली पुरक मागणीद्वारे प्राप्त निधीतून करण्यात येईल.

३) सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यातआले असून त्याचा संगणक सांकेतांक क्र.- २०१९०१२११३०६५२०५१९ असा आहे. सदर आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Shrirang Shripati Gholap

Digitally signed by Shrirang Shripati Gholap
DN: CN = Shrirang Shripati Gholap, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = DMU/R AND R
Date: 2019.01.21 13:14:40 +05'30'

**(श्रीरंग घोलप)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
२. प्रधान सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. प्रधान सचिव,जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. प्रधान सचिव, उर्जा विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. मुख्य अभियंता, (विशेष प्रकल्प) सार्वजनिक बांधकाम विभाग, बांधकाम भवन फोर्ट, मुंबई.
६. विभागीय आयुक्त, कोकण विभाग, कोकण भवन, बेलापूर, नवी मुंबई.
७. वित्तीय सल्लागार व सह सहसचिव, आपत्ती व्यवस्थापन प्रभाग, मंत्रालय, मुंबई.
८. आव्यप्र-१, संग्रहार्थ.

| अ.क्र | जिल्हयांची नावे |
|---|---|
| १ | मुंबई शहर |
| २ | मुंबई उपशहर |
| ३ | ठाणे |
| ४ | पालघर |
| ५ | रायगड |
| ६ | रत्नागिरी |
| ७ | सिंधुदुर्ग |
| ८ | नाशिक |
| ९ | नंदुरबार |
| १० | धुळे |
| ११ | अहमदनगर |
| १२ | जळगाव |
| १३ | धुळे |
| १४ | सातारा |
| १५ | सांगली |
| १६ | कोल्हापूर |
| १७ | सोलापूर |
| १८ | औरंगाबाद |
| १९ | जालना |
| २० | लातूर |
| २१ | बीड |
| २२ | उस्मानाबाद |

Shrirang Shripati Gholap

Digitally signed by Shrirang Shripati Gholap
DN: CN = Shrirang Shripati Gholap, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = DMU/R AND R
Date: 2019.01.21 13:15:20 +05'30'

**(श्रीरंग घोलप)**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन